**स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत बांधकाम व पाडकाम कचऱ्यावर प्रक्रिया करण्याच्या प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-स्वमअ-२०२०/प्र.क्र.२३/नवि-३४**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २८ जानेवारी,२०२०

**वाचा:-**

१. शासन निर्णय, नगर विकास विभाग, क्रमांक: स्वभाअ-२०१५/प्र. क्र. २३/नवि-३४, दि.१५.०५.२०१५
२. स्वच्छ भारत अभियान (नागरी) अंतर्गत गठीत उच्चाधिकार समितीच्या दिनांक ३० ऑगस्ट २०१९ रोजी पार पडलेल्या बैठकीचे इतिवृत्त.
३. पर्यावरण, वने व हवामान बदल खात्याने दिनांक २९ मार्च, २०१६ रोजी G.S.R. ३१७(E) अन्वये निर्गमित केलेले बांधकाम व पाडकाम कचरा व्यवस्थापन नियम, २०१६ (Construction & Demolition Waste Management Rules, २०१६)

**प्रस्तावना :-**

देशातील सर्व शहरांमधील नागरिकांना स्वच्छ पर्यावरण व चांगले आरोग्य मिळावे, या करिता केंद्र शासनामार्फत "स्वच्छ भारत अभियान (नागरी)" संपूर्ण देशामध्ये राबविण्यात येत आहे. केंद्र शासनाच्या "स्वच्छ भारत अभियान (नागरी)" च्या धर्तीवर संदर्भीय क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये राज्यामध्ये "स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी)" ची अंमलबजावणी सुरू आहे. या अभियांनांतर्गत शहरे "हागणदारी मुक्त" करणे व घनकचरा व्यवस्थापनांतर्गत "स्वच्छ" करणे या दोन प्रमुख घटकांचा समावेश आहे.

२. स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत गठीत मा. मुख्य सचिवांच्या अध्यक्षतेखालील उच्चाधिकार समितीने राज्यातील ३८३ नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचे घनकचरा व्यवस्थापनाचे प्रकल्प अहवालांस आतापर्यंत मान्यता देण्यात आली आहे. या प्रकल्पांची अंमलबजावणी विविध टप्प्यांवर सुरु असून, घनकचरा व्यवस्थापन नियम, २०१६ ची पूर्तता होण्यास हे प्रकल्प सहाय्यभूत ठरणार आहेत.

३. संदर्भीय क्र. ३ येथील आदेशान्वये केंद्र शासनातर्फे निर्गमित करण्यात आलेल्या बांधकाम व पाडकाम कचरा व्यवस्थापन नियम, २०१६ (Construction & Demolition Waste Management Rules, २०१६) ची प्रभावी अंमलबाजवणी करणे आवश्यक आहे. तसेच, स्वच्छ सर्वेक्षण - २०२० व कचरामुक्त शहरांचे तारांकित मानांकन मिळविण्यासाठी शहरांना बांधकाम व पाडकामाच्या कचऱ्यावर प्रक्रिया करणे आवश्यक झाले आहे. त्या अनुषंगाने राज्यातील काही शहरांना "बांधकाम व पाडकाम **कचऱ्यावर** प्रक्रिया करण्यासाठी प्रकल्प उभारण्यास" प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

प्रस्तावनेत नमूद केलेल्या बाबींचा विचार करून, बांधकाम व पाडकाम कचरा व्यवस्थापन नियम, २०१६ (Construction & Demolition Waste Management Rules, २०१६) ची प्रभावी अंमलबजवणी होण्याच्या दृष्टीने परिच्छेद २ मधील विवरण पत्रातील राज्यातील १९ महानगर पालिकांना एकूण रु.१०५.१४ कोटी

किंमतीच्या बांधकाम व पाडकाम **कचऱ्यावर** प्रक्रिया करण्याचे प्रकल्प उभारण्यास या शासन निर्णयातील परिच्छेद ४ मध्ये नमूद अटी व शर्तींच्या अधीन राहून शासन प्रशासकीय मान्यता देत आहे.

२. त्यानुसार, खालील विवरणपत्रातील रकाना २ मधील संबंधित महानगर पालिकांच्या नावासमोर दर्शविल्यानुसार रकाना ४ मधील क्षमतेचे व रकाना ५ मधील किंमतीचे बांधकाम व पाडकाम **कचऱ्यावर** प्रक्रिया करण्याचे प्रकल्प मंजूर करण्यात येत असून, सदर प्रकल्पांचा वित्तीय आकृतिबंध रकाना ६, ७ व ८ मध्ये दर्शविल्यानुसार राहील

**(रूपये कोटीत)**

| **अ.क्र.** | **नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव** | **प्रकल्प क्षमता (TPD)** | **प्रकल्प किंमत** | **केंद्र हिस्सा (प्रकल्प किंमतीच्या ३५%)** | **राज्य हिस्सा (प्रकल्प किंमतीच्या २३.३%** | **नागरी स्थानिक स्वराज्य हिस्सा** |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | Nashik | १५० | ७.५२३५ | २.६३३३ | १.७५३ | ३.१३७३ |
| २ | Kalyan-Dombivli | १५० | ७.५२३५ | २.६३३३ | १.७५३ | ३.१३७३ |
| ३ | Vasai-Virar | १५० | ७.५२३५ | २.६३३३ | १.७५३ | ३.१३७३ |
| ४ | Nagpur | १५० | ७.५२३५ | २.६३३३ | १.७५३ | ३.१३७३ |
| ५ | Solapur | १५० | ७.५२३५ | २.६३३३ | १.७५३ | ३.१३७३ |
| ६ | Mira-Bhaindar | १५० | ७.५२३५ | २.६३३३ | १.७५३ | ३.१३७३ |
| ७ | Bhiwandi | १५० | ५ | १.७५ | १.१६५ | २.०८५ |
| ८ | Amravati | ७५ | ५ | १.७५ | १.१६५ | २.०८५ |
| ९ | Nanded-Waghala | ७५ | ५ | १.७५ | १.१६५ | २.०८५ |
| १० | Kolhapur | ७५ | ५ | १.७५ | १.१६५ | २.०८५ |
| ११ | Ulhasnagar | ७५ | ५ | १.७५ | १.१६५ | २.०८५ |
| १२ | Malegaon | ७५ | ५ | १.७५ | १.१६५ | २.०८५ |
| १३ | Jalgaon | ७५ | ५ | १.७५ | १.१६५ | २.०८५ |
| १४ | Akola | ५० | ५ | १.७५ | १.१६५ | २.०८५ |
| १५ | Latur | ५० | ४ | १.४ | ०.९३२ | १.६६८ |
| १६ | Dhule | ५० | ४ | १.४ | ०.९३२ | १.६६८ |
| १७ | Ahemdnagar | ५० | ४ | १.४ | ०.९३२ | १.६६८ |
| १८ | Chandrapur | ५० | ४ | १.४ | ०.९३२ | १.६६८ |
| १९ | Parbhani | ५० | ४ | १.४ | ०.९३२ | १.६६८ |
| | | १८०० | १०५.१४१ | ३६.७९९८ | २४.४९८ | ४३.८४३८ |

३. <u>**निधी वितरणाची कार्यपध्दती**</u> :

३.१ केंद्र शासन पुरस्कृत स्वच्छ भारत अभियानाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार केंद्र व राज्य शासनाचा अनुज्ञेय हिश्याचा निधी हा दोन टप्यात (५० टक्के + ५० टक्के) वितरीत केला जाईल.

३.२ सदर प्रकल्पासाठी निधी वितरीत करताना दिलेल्या सूचनांनुसार, सदर प्रकल्पासाठी प्राप्त निधी शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहीत केलेल्या बँकांमध्ये, स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील.

३.३ सदर प्रकल्पासाठी वितरीत केलेला निधी त्याच प्रकल्पासाठी वापरणे बंधनकारक असून त्याचा वापर इतर प्रयोजनार्थ केल्यास सदर बाब ही गंभीर वित्तिय अनियमितता समजण्यात येईल.

३.४ राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था / कार्यान्वयन यंत्रणेची राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध करून दिले जाणार नाही.

३.५ स्वच्छ महाराष्ट्र अभियान (नागरी) अंतर्गत मंजूर "बांधकाम व पाडकाम कचऱ्यावर प्रक्रिया करण्याच्या प्रकल्पासाठी" केंद्र व राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदाना व्यतिरिक्त उर्वरित निधी संबंधित नागरी स्थानिक स्वराज संस्थेने उभारून किंवा १४ व्या वित्त आयोगातील अनुज्ञेय रकमेतून केंद्र व राज्य शासनाच्या हिश्याच्या प्रमाणात खर्च करणे आवश्यक राहील.

३.६ स्वच्छ महाराष्ट्र अभियानाच्या वित्तिय आकृतीबंधानुसार केंद्र व राज्य शासनाने वितरीत केलेल्या निधीच्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज संस्थेने स्व:हिश्याचा निधी उभारून, सदर एकत्रित खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्रकेंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रात सादर करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेवर बंधनकारक असणार आहे.

३.७ सदर प्रकल्पासाठी उपलब्ध करून दिलेल्या केंद्र व राज्य शासनाच्या हिश्श्याच्या प्रथम हप्त्याच्या निधीचे विहित नमुन्यातील उपयोगिता प्रमाणपत्र राज्य शासनास सादर केल्यानंतर दुसऱ्या हप्त्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

४. <u>**अटी व शर्ती :**</u>

४.१ सदर प्रकल्पासाठी कार्यान्वयन यंत्रणा संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था राहील.

४.२ केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना व संदर्भाधीन क्रमांक ३ येथील बांधकाम व पाडकाम कचरा व्यवस्थापन नियम, २०१६ (Construction & Demolition Waste Management Rules, २०१६) नुसार सदर प्रकल्पाची अंमलबजावणी विहित कालावधीमध्ये करणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

४.३ बांधकाम व पाडकाम कचरा व्यवस्थापन नियम, २०१६ (Construction & Demolition Waste Management Rules, २०१६), अन्वये विहित केलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार बांधकाम व पाडकाम कचरा प्रक्रिया प्रकल्पांचे सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यात आलेले आहेत. या प्रकल्प अहवालाची यशस्वीता ही बांधकाम व पाडकाम कचरा व्यवस्थापन यंत्रणेच्या कार्यक्षम कार्यान्वयावर अवलंबून आहे. त्यामुळे, शहरात बांधकाम व पाडकाम कचरा व्यवस्थापन यंत्रणा कार्यान्वित असणे आवश्यक आहे.

४.४ या कचऱ्याची वाहतूक व त्यावर करावयाची शास्त्रोक्त प्रक्रीया या बाबीची सविस्तर प्रकल्प अहवालामध्ये समाविष्ठ बाबींची विहित कालावधीमध्ये अंमलबजावणी करण्याची जबाबदारी कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.५ सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करताना पुढील ५ वर्षाची आवश्यकता विचारात घेवून तयार केलेला आहे. या प्रकल्प अहवालाची अंमलबजावणी सुरू करताना सध्याची आवश्यकता विचारात घेवूनच आवश्यक खरेदी व बांधकामे करण्यात यावीत.

४.६ प्रकल्पाचे काम सुरु झाल्यानंतर सक्षम प्राधिकाऱ्याने कामाची गुणवत्ता व देयके प्रमाणित केल्यानंतर उपलब्ध निधीच्या मर्यादेत कामाची देयके १५ दिवसांत संबंधित कंत्राटदारास देण्याची जबाबदारी संबंधित स्थानिक स्वराज्य संस्था/कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.७ प्रकल्पाच्या देखभाल दुरुस्ती खर्चासाठी आवश्यक ती यंत्रणा संबंधित स्थानिक स्वराज्य संस्थेने विकसित करावी व त्याद्वारे सदर प्रकल्पासाठीचा देखभाल व दुरुस्तीचा खर्च भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२८१६४६५७७४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ajit Sahebrao Palwe

Digitally signed by Ajit Sahebrao Palwe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bcc5dbdaa52955626b8257f1105a8a62ddbd1337948a428b4e4c992e5d3bf423, cn=Ajit Sahebrao Palwe
Date: 2020.01.29 11:55:26 +05'30'

**(अजित पालवे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
२. मा. मंत्री, नगर विकास यांचे खासगी सचिव
३. मा. राज्यमंत्री नगरविकास विभाग यांचे खाजगी सचिव
४. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक
५. अप्पर मुख्य सचिव,नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक
६. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
८. आयुक्त तथा संचालक, नगरपालिका प्रशासन संचालनालय, मुंबई.
९. राज्य अभियान संचालक, स्वच्छ महाराष्ट्र अभियान संचालनालय, मुंबई.
१०. विभागीय आयुक्त, (सर्व).
११. जिल्हाधिकारी, (सर्व).
१२. जिल्हा प्रशासन अधिकारी, सर्व.
१३. आयुक्त, महानगर पालिका (नाशिक, कल्याण-डोंबिवली, वसई-विरार, नागपुर, सोलापूर, मीरा भायंदर, भिवंडी-निझामपुर, अमरावती, नांदेड-वाघाळा, कोल्हापूर, उल्हासनगर, मालेगांव, जळगांव, अकोला, लातूर, धुळे, अहमदनगर, चंद्रपूर व परभणी)
१४. निवडनस्ती, नवि-३४.